**उद्योग सहसंचालक (गट-अ) या संवर्गातील पदांवर तदर्थ पदोन्नती.**

**महाराष्ट्र शासन**

**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**

**शासन निर्णय क्र.पदोन्न-१४१५/प्र.क्र.२६/उद्योग-३,**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक :- २६ ऑगस्ट, २०१५.

**वाचा :**- उद्योग संचालनालयाचे पत्र क्र.उसं/आस्था/पदोन्नती/७२२/उससं/२०१५/अे-१२२१, दि.३० एप्रिल, २०१५.

**शासन निर्णय** :-

उद्योग संचालनालयांतर्गत अधिक्षकीय उद्योग अधिकारी (गट-अ) (वे.श्रे. रु.१५६००-३९१०० + ग्रेड पे रु. ६६००) या पदावर कार्यरत असलेल्या अधिकाऱ्यांना उद्योग सहसंचालक (गट-अ) (वे.श्रे. रु. १५६००-३९१०० + ग्रेड पे रु. ७६००) या पदांवर तदर्थ स्वरुपात पदोन्नती देण्यात येत असून त्यांची पदस्थापना पुढील प्रमाणे त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या पदांवर खाली नमूद केलेल्या अटींच्या अधिन राहून करण्यात येत आहे.

| **अ.क्र** | **अधिकाऱ्यांचे नाव व प्रवर्ग** | **सध्याचे पदनाम व ठिकाण** | **पदोन्नतीनंतर पदस्थापनेचे ठिकाण** |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १. | श्री.शै.गि.राजपूत (वि.जा.-अ) | महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र, कोल्हापूर | उद्योग सहसंचालक, कोकण विभागीय कार्यालय, ठाणे. |
| २. | श्री.ब.सू.जोशी (खुला) | महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र ,औरंगाबाद | उद्योग सहसंचालक, विभागीय कार्यालय, नाशिक. |
| ३. | श्री.अ.प्र.धर्माधिकारी (खुला) | महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र ,नागपूर | उद्योग सहसंचालक, विभागीय कार्यालय, अमरावती. |

१) सदर पदोन्नती मा.उच्च न्यायालय येथे प्रलंबित असलेली याचिका क्र.७२५६/२०१५ च्या अंतिम निर्णयाच्या अधिन राहील.

२) सदर पदोन्नती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून **तदर्थ** स्वरुपात देण्यात येत आहे.

२. संबंधित अधिका-यांनी त्यांच्या सध्याच्या पदाचा कार्यभार विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या आदेशानुसार अन्य अधिका-यांकडे सोपवून पदोन्नतीच्या पदावर तात्काळ रुजू व्हावे.

३. संबधित अधिकारी ज्या दिनांकास पदोन्नतीच्या पदावर रुजू होतील त्या दिनांकापासून त्यांना पदोन्नती विषयक लाभ अनुज्ञेय होतील.

४. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांनी संबंधित अधिकारी पदोन्नतीच्या ठिकाणी रुजू होण्याच्या दृष्टीने आवश्यक ती कार्यवाही करावी व याबाबतचा कार्यपालन अहवाल शासनास सादर करावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८२६१२५३००८३१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vaijnath Bhujangrao Latake

Digitally signed by Vaijnath Bhujangrao Latake
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8502d8fbaa5d3d31358e5bf349fc0853019893b61049b2ad260bccf75c596136, cn=Vaijnath Bhujangrao Latake
Date: 2015.08.26 12:56:27 +05'30'

( वै.भू.लटके )
शासनाचे उप सचिव.

**प्रत,**

१) मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव,
२) राज्यमंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव,
३) श्रीकांत अ.जोशी माजी वि.प.स. मराठवाडा पदवीधर मतदार संघ, गुरुकुंज हा.सो., टिळकनगर, संभाजीनगर-०५ यांना त्यांच्या दि.२३.२.२०१५ च्या पत्राच्या संदर्भात अग्रेषित.
४) प्रधान सचिव (उद्योग) यांचे स्वीय सहायक,
५) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२(लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), मुंबई /नागपूर.
६) अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई.
७) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८) जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद /नागपूर/नाशिक/कोल्हापूर/अमरावती
९) उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (१३/१६ब ), मंत्रालय, मुंबई.
१०) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई,
११) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, कुपरेज टेलिफोन निगम इमारत, मुंबई (*पत्राने)
१२) सर्व उद्योग सह संचालक, विभागीय कार्यालये,
१३) सर्व महाव्यवस्थापक/व्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र
१४) सर्व संबंधित अधिकारी,
१५) निवड नस्ती (उद्योग-३)